**कोयना अवजल वापर अभ्यास गटाच्या शिफारशींवर कार्यवाही करण्यासाठी विविध विभागांच्या उपसचिवांचा समावेश असणारी शक्ती प्रदान समिती गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

जलसंपदा विभाग

शासन निर्णय क्रमांक : कोयना-२००८/प्र.क्र.२३४/०८/जसंनि

मादाम कामा मार्ग, हुतात्मा चौक,

मंत्रालय, मुंबई -३२

दिनांकः ०६ ऑगस्ट,२०११.

संदर्भ :- शासन निर्णय क्रमांक विसस २००५/(९७/०५) जसंनि
दि. २५.१०.२००५.

**प्रस्तावना :-**

कोयना जलविद्युत केंद्रामधून विद्युत निर्मीतीनंतर वशिष्ठी नदीत सोडण्यात येणा-या अवजलाचा वापर करुन तसेच अन्य पर्यायी स्त्रोतातून रत्नागिरी व सिंधुदुर्ग जिल्हयातील पाणी टंचाई दूर करण्याच्या संदर्भातील अभ्यास करण्यासाठी श्री. म.द.पेंडसे निवृत्त सचिव, (जलसंपदां विभाग) यांच्या अध्यक्षतेखाली दि. २५.१०.२००५ च्या शासन निर्णयान्वये एक अभ्यास गट नियुक्त करण्यात आला होता. कोयना अवजलाचा वापर करण्याच्या अनुषंगाने नियुक्त केलेल्या अभ्यासगटाचा अंतिम अहवाल मा. मंत्री, जलसंपदा (कृखोपाम वगळून) यांना मा. सचिव, जलसंपदा यांचे उपस्थितीत दि. २७.०९.२००६ रोजी मा. श्री. म. दि. पेंडसे अध्यक्ष, कोयना अवजल वापर अभ्यासगट यांचे हस्ते सादर करण्यात आला आहे. सदर अहवालातील शिफारशी अभिप्रायासाठी मंत्रालयातील विविध विभागाशी संबंधीत असल्याने याबाबतचे अभिप्राय यांचेकडून मागविण्यात आले. शासनाकडे प्राप्त अहवालावर कार्यवाही करण्याबाबत सामान्य प्रशासन विभाग दि. ३१ मे, १९७६ च्या परिपत्रान्वये कार्यपध्दती निश्चित करण्यात आलेली आहे. त्यानुसार अहवालातील शिफारशी जास्त विभागाशी संबंधीत असल्यास त्या त्या विभागाचा समावेश असणारी शक्तीप्रदान समिती गठीत करून व या समितीच्या वेळोवेळी बैठका आयोजित करून माहितीचे संकलन करण्याच्या सुचना सा. प्र. विभागाने दिलेल्या आहेत. त्यानुसार, प्रस्तूत अहवालातील शिफारशी जास्त विभागाशी संबंधीत असल्यास त्या त्या विभागाच्या उपसचिवांचा समावेश असणारी शक्ती प्रदान समिती गठीत करणे आवश्यक आहे. त्यानुषंगाने, जलसंपदा विभागाच्या मुख्य अभियंता (ज.सं.) व सह सचिव यांच्या अध्यक्षतेखाली संबंधीत विभागाच्या उपसचिवांची शक्ती प्रदान समिती गठीत करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

कोयना अवजल अभ्यास गटाच्या अहवालातील शिफारशीवर अभ्यास करुन त्याबाबतचा अहवाल सादर करण्याच्या दृष्टीने शक्तीप्रदान समितीची पुढीलप्रमाणे स्थापना करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १. | मुख्य अभियता (जसं) व सह सचिव, जलसंपदा विभाग | अध्यक्ष |
| २. | मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग | सदस्य |
| ३. | उप सचिव ( पर्यटन ) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग | सदस्य |
| ४. | उप सचिव(कृषि व फलोत्पादन), कृषि व पदुम विभाग | सदस्य |
| ५. | वि.का.अ. (उर्जा -५), उद्दयोग, उर्जा व कामगार विभाग | सदस्य |
| ६. | उप सचिव (उद्दयोग), उद्दयोग, उर्जा व कामगार विभाग | सदस्य |
| ७. | उप सचिव (पदुम), कृषि व पदुम विभाग | सदस्य |
| ८. | उप सचिव (वने), महसूल व वन विभाग | सदस्य |
| ९. | उप सचिव (निवस), जलसंपदा विभाग | सदस्य |
| १०. | उप सचिव (लपा), जलसंपदा विभाग | सदस्य |
| ११. | उप सचिव (सि.व्य.), जलसंपदा विभाग | सदस्य |
| १२. | उप सचिव (जवि), जलसंपदा विभाग | सदस्य |
| १३. | उप सचिव (जसं), जलसंपदा विभाग | सदस्य सचिव |

सदर समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील.

कोयना अवजल अभ्यास गटाच्या अहवालातील शिफारशीवर अभ्यास करुन कार्यवाही करण्यासाठी अहवाल सादर करणे.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०८०६१५३८०४००१असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( सु. रा. बावस्कर )
शासनाचे अवर सचिव

प्रत,

मा. मुख्यमंत्री, सचिवालय, मंत्रालय, मुंबई.

मा. उपमुख्यमंत्री, सचिवालय, मंत्रालय, मुंबई.

मा. मंत्री, जलसंपदा (कृखोपामं वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

मा. मंत्री, जलसंपदा (कृखोपामं) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

मा. राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

प्रधान सचिव ( पर्यटन ), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.

प्रधान सचिव (उद्दयोग), उद्दयोग, उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.

प्रधान सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.

प्रधान सचिव(कृषि व फलोत्पादन), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.

प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.

सचिव (पदुम), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.

सचिव (उर्जा), उद्दयोग, उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.

सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक.

सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक.

मुख्य अभियता (जसं) व सह सचिव, जलसंपदा विभाग, यांचे स्वीय सहाय्यक.

मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.

उप सचिव ( पर्यटन ) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.

उप सचिव(कृषि व फलोत्पादन), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.

वि.का.अ. (उर्जा -५), उद्दयोग, उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.

उप सचिव (उद्दयोग), उद्दयोग, उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.

उप सचिव (पदुम), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.

उप सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.

उप सचिव (निवस), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

उप सचिव (लपा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

उप सचिव (सि.व्य.), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

उप सचिव (जवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

उप सचिव (जसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे.

मुख्य अभियंता, कोकण प्रदेश, मुंबई.

अधिक्षक अभियंता, कोकण पाटबंधारे महामंडळ, कुवंरबाव, रत्नागिरी.

कार्यासन- जलसंपत्ती नियोजन, जलसंपदा विभाग (संग्रहार्थ)